वन विभागाची पुनर्रचना - प्रधान मुख्य वनसंरक्षक कार्यालयासाठी नवीन पदांची निर्मिती या योजनेत्तर योजनेतील पदांना सन २०१८-१९ करीता मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: एफडीएम २०१८/प्र.क्र.२२/फ-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : १९ ऑक्टोबर, २०१८**

वाचावे :-

१) शासन निर्णय क्रमांक, असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि.०४.१०.२००४

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक:कक्ष-३/ योजनेत्तर/ प्र.क्र.१६/१७-१८/२१९२, दि.२६.०२.२०१७

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग,क्रमांक-एफडीएम-२०१८/प्र.क्र.२२/फ-२ दि. ३१.०३.२०१८.

४) शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३/यो/प्र.क्र.१ /१८-१९/११०१/१८-१९, दि.२४.०९.२०१८

**शासन निर्णय :-**

वन विभागाची पुनर्रचना-प्रधान मुख्य वनसंरक्षक कार्यालयासाठी नवीन पदांची निर्मिती या योजनेत्तर योजनेतील ५ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये दिनांक ०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये शासनाची मंजूरी देण्यात आली होती. सदर पदांची मुदत दि.३०.०९.२०१८ रोजी संपुष्टात आली आहे.खालील दर्शविलेल्या विवरण पत्रातील ५ अस्थायी पदे ही वनविभागाच्या २५०२५ पदांच्या मंजूर आकृतीबंधात समाविष्ट असल्याने या ५ अस्थायी पदांना संदर्भ क्र. २ व ५ येथील पत्रान्वये प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने दि. ०१.१०.२०१८ ते दि. २८.०२.२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण) | १ |
| २ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण) | १ |
| ३ | मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) | १ |
| ४ | स्वीय सहायक | २ |
| | **एकूण** | **५** |

२. याबाबत वेतनासाठी होणारा खर्च -प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) ०१ वनीकरण, ००१ संचालन व प्रशासन (०१) (०१) मुख्य वनसंरक्षक (२४०६ ००२२) ०१ वेतन या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१८-१९ या वर्षाकरीता मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदर कालावधी मध्ये त्यांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून

सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. या नंतर सुधारीत आकृतीबंध निश्चीत करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही. तसेच आस्थापनेवरील पदांचा आढावा घेवून, सुधारीत आकृतीबंधाचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करावयाचा असल्याने त्वरीत कार्यवाही करुन शासनास प्रस्ताव सादर करावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/ प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१९१५०१०१९०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.10.19 15:05:54 +05'30'

**(अतुल कोदे)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रतिलिपी** :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
६) वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-४/ मंत्रालय, मुंबई
७) नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई
८) वन विभागातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) कार्यासन अधिकारी, ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.